तत्काल

मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द सादर केलेल्या अभिवेदनांवर विचार करण्यासाठी अवलंबिण्यात यावयाची कार्यपध्दती.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक,क्रमांक एसआरसी-१०८८/प्रक्र० ५/पंधरा,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २८ ऑगस्ट, १९९०

## प रि प त्र क

महाराष्ट्र नागरी सेवा[निवृत्ती वेतन] नियम,१९८२ च्या नियम १० [४] व नियम ६५ मधील तरतुदीनुसार ज्या शासकीय कर्मचा-यांना/अधिका-यांना मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्यात येते अशा कर्मचारी/अधिका-यांकडून काही वेळा त्यांच्या मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द अभिवेदने सादर करण्यात येतात. अशी अभिवेदने विचारात घेण्यासाठी कोणत्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा यासंबंधीच्या सूचना वेळोवेळी देण्यात आलेल्या आहेत.

२. शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र. एसआरसी-१०८८/प्रक्र. ५/पंधरा, दि. १०. ८. १९८८ च्या परिपत्रकातील परि. २ अन्वये विहित केलेल्या प्रपत्रामध्ये अंशत: बदल करुन आता सोबत जोडल्याप्रमाणे सुधारित प्रपत्र विहित करण्यात येत आहे. सर्व मंत्रालयीन विभागांना अशी विनंती करण्यात येते की,शासकीय कर्मचारी/अधि अधिका-यांनी मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द सादर केलेली अभिवेदने सामान्य प्रशासन विभागाकडे पुढील कार्यवाहीसाठी पाठविताना अशा कर्मचा-यांनी/अधिका-यांनी सादर केलेल्या अभिवेदनाच्या व सोबतच्या सुधारित विहित प्रपत्रातील माहितीच्या- वर्ग १ अधिका-यांबाबत १५ प्रती व वर्ग-२/वर्ग-३ अधिकारी/कर्मचा-यांबाबत २ प्रती प्रस्तावासोबत पाठविण्यात याव्यात.

३. सर्व मंत्रालयीन विभागांना अशीही विनंती आहे की, मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द सादर केलेल्या अभिवेदनांवर जरुर ती कार्यवाही लवकरात लवकर पूर्ण करण्याची कृपया दक्षता घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[श्या. पं. कामतकर]
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
शासनाचे सर्व सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग/कार्या. क्र. १३

गोपनीय

# प्रपत्र [सुधारित]

मुदतपूर्व सेवा निवृत्तीच्या नोटिसी विरुध्द संबंधित अधिका-यांनी दिलेल्या अभिवेदनाच्या संदर्भात अभिवेदन समितीच्या विचारार्थ द्यावयाची आवश्यक माहिती.

१. अधिका-याचे नांव व हुद्दा :

२. प्रशासकीय विभागाचे नांव :

३. [अ] जन्मदिनांक :

[ब] सध्याचे वय :

[क] नियम वयोमानानुसार सेवा-निवृत्तीचा दिनांक :

४. मुदतपूर्व सेवा निवृत्तीच्या नोटिशीचा दिनांक :

५. सदर नोटीस संबंधित अधिका--यास मिळाल्याचा दिनांक :

६. मुदतपूर्व सेवा निवृत्तीच्या नोटीशी विरुध्दच्या अभिवेदनाचा दिनांक :

७. अभिवेदन विहित मुदतीत मिळाले आहे काय ? :

८. संबंधित अधिकारी प्रत्यक्षात सेवा-निवृत्त झाला आहे काय ? असल्यास कोणत्या दिनांकापासून ? :

९. विभागीय चौकशी प्रलंबित/प्रस्तावित आहे काय? असल्यास, त्याबाबतची सद्य:स्थिती. :

१०. संबंधित अधिकारी शारीरिक दृष्टया सेवेत राहण्यास पात्र आहे काय ? :

११. [अ] संबंधित अधिका-याच्या सचोटी संबंधीचे अभिप्राय :

[ब] सचोटी संशयास्पद असल्यास त्याबाबत योग्य तो पुरावा उपलब्ध आहे काय ? त्यासंदर्भात अन्य काही कारवाई करण्यात आली आहे काय ? :

कृ. मा. प.

१२. संबंधित अधिकाऱ्यांच्या गेल्या ५ वर्षांच्या गोपनीय अभिलेखात प्रतिकुल शेरे असल्यास ते त्यांना कळविण्यात आले होते काय? [अशा प्रतिकूल शेऱ्याविरुध्द त्यांनी अभिवेदन सादर केले असल्यास त्यावर केलेली कार्यवाही देखील नमूद करावी. ] :

१३. संबंधित अधिकाऱ्याला शासकीय सेवेत चालू ठेवण्याबाबतच्या योग्यतेसंबंधी संबंधित मंत्रालयीन विभागाच्या सचिवाचे अभिप्राय :

१४. संबंधित अधिकाऱ्याने मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या नोटिशीविरुध्द न्यायालयात याचिका सादर केलेली आहे काय ? :
असल्यास,
[अ] न्यायालयाने कोणते अंतरिम/अंतिम आदेश दिले आहेत :
[ब] पुढील सुनावणीचा दिनांक :
[क] अभिवेदनाचा विचार करण्यासाठी न्यायालयाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक आहे. तरी, विभागाने न्यायालयाची तशी परवानगी घेतली आहे काय ? :

१५. काही विशेष माहिती नमूद करावयाची असल्यास त्याबाबतचा तपशील. :

१६. अभिवेदनावर प्रशासकीय विभागाचे परिच्छेदनिहाय अभिप्राय. :

| अभिवेदनामध्ये उपस्थित केलेले मुद्दे | प्रशासकीय विभागाचे अभिप्राय |
| --- | --- |

प्रस्ताव पाठविणाऱ्या अधिकाऱ्याची दिनांकित सही व पदनाम.